**संजीवन इंजिनिगरींग ॲन्ड टेक्नालॉजी इन्स्टिटयुट, पन्हाळा, कोल्हापूर या खाजगी विनाअनुदानित संस्थेमध्ये उपयोजित कला (BFA-Applied Arts) व रेखा व रंगकला (BFA-Painting) हे नवीन पदवी अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. एडीआर-२०२३/प्र.क्र.६२/तांशि ६,**
मंत्रालय, विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १० जुलै, २०२३

संदर्भ : १. शिक्षण व नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक टीईएम ३३८२/१११८३६ (१९०) तांशि-१ (अ) दिनांक २१ मे,१९८३.
२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शा.नि.क्र. टीईएम-२०१८/प्र.क्र.२३/तांशि-४, दि. २२ फेब्रुवारी, २०१८
३. सदस्य सचिव, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद यांचे पत्र क्र.वेर्स्टन/१-३६४५०४४२२३१/ २०२३/EOA, दि. २२ जून,२०२३.
४. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचे क्र. डिओअे-२०२३ /दोन /१३२१ व दि.१७८५ दिनांक ९ मे,२०२३.व दि.३० जून,२०२३ची पत्रे

**प्रस्तावना :**

सदस्य सचिव, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद यांच्या संदर्भ क्र ३ येथील दिनांक २३ जून, २०२३च्या पत्रान्वये संजीवन इंजिनिगरींग ॲन्ड टेक्नालॉजी इन्स्टिटयुट,पन्हाळा, कोल्हापूर या खाजगी विनाअनुदानित संस्थेमध्ये उपयोजित कला (BFA-Applied Arts) व रेखा व रंगकला (BFA-Painting) हे नवीन पदवी अभ्यासक्रम ३० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसह विना अनुदानित तत्वावर शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून सुरु करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर नवीन अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या सोयी सुविधांची तपासणी कला संचालनालयाच्या स्तरावरील द्वीसदस्यीय समितीकडून करण्यात आली असून त्याबाबतचा प्रस्ताव शिफारशींसह संदर्भ क्रमांक (४) येथील पत्रान्वये प्राप्त झाला आहे. त्यानुसार संजीवन इंजिनिगरींग ॲन्ड टेक्नालॉजी इन्स्टिटयुट,पन्हाळा, कोल्हापूर या खाजगी विनाअनुदानित संस्थेमध्ये उपयोजित कला (BFA-Applied Arts) व रेखा व रंगकला (BFA-Painting) हे नवीन पदवी अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

सदस्य सचिव, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद यांच्या संदर्भ क्र ३ येथील दिनांक २२जून, २०२३च्या पत्रान्वये देण्यात आलेल्या मान्यतेस अनुसरून संजीवन इंजिनिगरींग ॲन्ड टेक्नालॉजी इन्स्टिटयुट,पन्हाळा, कोल्हापूर या खाजगी विनाअनुदानित संस्थेमध्ये उपयोजित कला (BFA-Applied Arts) व रेखा व रंगकला (BFA-Painting) हे अभ्यासक्रम विना अनुदानित तत्वावर ३० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसह, शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून सुरू करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे. :-

१. सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.
२. अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच, दिनांक २१ मे,१९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.
३. सदर अभ्यासक्रमासाठी अधिकतम प्रवेश क्षमता ३० विद्यार्थी इतकी राहील.

४. शासनाने विहित केलेल्या तसेच, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच, संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पुर्तता संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

५. सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

६. संबंधित संस्थेने आवश्यक नोंदणी शुल्क जमा करावे. तसेच, संचीत ठेव संयुक्त खात्यात भरून इतर कायदेशीर बाबींची पुर्तता करावी.

७. सदर पदवी अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार /पध्दतीनुसार करण्यात येतील.

८. शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थानी आकारल्यास त्या संस्थावर महाराष्ट्र एज्युकेशन इन्स्टिटयूशन (प्रोहिबिशन आफॅ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

९. संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पुर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते द्यावेत. शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच, विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास कडक कारवाई करण्यात येईल.

१०. संस्थेतील ग्रंथालयासाठी आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच, विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. वाचनालय, वर्गखोल्या इ.) उपलब्ध करणे आवश्यक आहे.

११.रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अमंलबजावणी करणे आवश्यक राहील.

१२. अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने निश्चित केलेली अर्हता धारण केलेल्या अध्यापकांची नियुक्ती करणे अनिवार्य राहील.

१३. याशिवाय संचालक कला संचालनालय, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अटी व शर्ती लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१०१२५७१८९६०८ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by HUSSEIN ALIMIYA MUKADAM
Date: 2023.07.10 13:07:05 +05'30'

**( हुसेन अ. मुकादम )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य , मुंबई.
३. प्राचार्य, संजीवन इंजिनिगरींग अ‍ॅन्ड टेक्नालॉजी इन्स्टिटयुट,पन्हाळा, कोल्हापूर.
४. सदस्य सचिव, भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद , नेल्सन मंडेला मार्ग, वसंतकुंज , नवी दिल्ली -११० ०७०.
५. निवडनस्ती.